**एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेस प्रतिवर्षी रु. ०१ कोटी निधी उपलब्ध करुन देण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण २०२२/प्र.क्र.९२/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०८ मार्च, २०२३.

संदर्भ : १) तत्कालीन मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ३०.०५.२०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
२) ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ३४/एसोमुं /२०२२-२३/९५७१-७२, दिनांक १५.११.२०२२.

प्रस्तावना :

एशियाटिक सोसायटी, नगर भवन, मुंबई या संस्थेची स्थापना सन १८०४ मध्ये झाली आहे. सदर संस्था, ग्रंथालयाला शैक्षणिक अभ्यासाचे एक प्रमुख केंद्र बनविणे, ग्रंथसंपदा समृद्ध करणे, विद्वजनांचे व्याख्याने/चर्चासत्रे आयोजित करणे, दुर्मिळ हस्तलिखित, दुर्मिळ नाणीसंग्रह, प्राचीन नकाशे व संदर्भ ग्रंथ यांचे जतन करणे व ते वाचकांस संशोधनासाठी उपलब्ध करुन देणे इ. कार्ये करते.

एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेच्या समस्येबाबत तत्कालिन मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली दिनांक ३०.०५.२०२२ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये मा. उपमुख्यमंत्री महोदयांनी एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेला राज्य शासनाकडून प्रतिवर्षी रु. १.०० कोटी इतके अर्थसहाय्य देण्यासाठी योजना प्रस्तावित करण्याचे निर्देश दिले. यानुषंगाने एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेस प्रतिवर्षी रु. ०१ कोटी निधी उपलब्ध करुन देण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेस सन २०२३-२४ या आर्थिक वर्षापासून प्रतिवर्षी रु. ०१ कोटी निधी उपलब्ध करुन देण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीचा विनियोग खालीलप्रमाणे करण्यात यावा : -

| अ.क्र. | तपशील | खर्च ( रुपयात ) |
|---|---|---|
| १ | नियतकालिकांची खरेदी आणि प्रक्रिया | १०,००,०००/- |
| २ | पुस्तकांची खरेदी आणि प्रक्रिया | १५,००,०००/- |
| ३ | प्रयोगशाळा संवर्धन खर्च | २०,००,०००/- |
| ४ | मायक्रोफिल्मिंग लॅब खर्च | १०,००,०००/- |
| ५ | आयटी अपग्रेडेशन | ४,००,०००/- |
| ६ | आउटरीच/सेमिनार इ. | २,००,०००/- |
| ७ | विशेष कार्यक्रम | २,००,०००/- |
| ८ | ग्रंथालय पायाभूत सुविधा | १२,००,०००/- |
| ९ | आस्थापना खर्च | २५,००,०००/- |
| | **एकूण** | **१,००,००,०००/-** |

२. एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेन खालील अटींचे अनुपालन करणे आवश्यक राहील -

१) उपरोक्तप्रमाणे खर्च करताना संस्थेला आवश्यकता असल्यास तक्त्यात नमूद कोणत्याही बाबीसाठी ५० % मर्यादेपर्यंत खर्च कमी जास्त करता येईल, तथापि, एकूण खर्च हा रु. ०१ कोटी मर्यादेतच असावा.

२) राज्य शासनाकडून मिळणारा निधी वेतन व भत्ते या बाबींवर खर्च करता येणार नाही, संस्थेच्या कर्मचाऱ्यांच्या वेतनाचा खर्च संबंधित संस्थेने करावा.

३) राज्य शासनाकडून मिळणाऱ्या निधीचे विनियोग ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी विहीत पध्दतीने करणे आवश्यक राहील. यासाठी ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे नियंत्रक म्हणून काम पाहतील.

४) संस्थेस वितरीत केलेल्या निधीतून केलेल्या कामाची तपासणी करुन त्याबाबतचा अहवाल ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी शासनास सादर करावा.

५) खर्च केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र संस्थेने विहित मुदतीत ग्रंथालय संचालनालयामार्फत शासनास सादर करावे.

६) केंद्र व राज्य शासनाकडून मिळणारा निधी हा एकाच प्रयोजनासाठी खर्च करण्यात येवू नये.

७) एशियाटिक सोसायटीने शासनाच्या निधीतून डिजीटायजेशन करण्यांत आलेली दुर्मिळ ग्रंथ, तदानुषंगिक माहिती ग्रंथालय संचालनालय, अधिनस्त शासकीय ग्रंथालये तसेच टप्प्याटप्प्याने शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांनाही (अ,ब,क,ड वर्गनिहाय) विनामुल्य उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

८) शासनास आवश्यक असेल तेव्हा प्राधान्याने व विनामूल्य एशियाटिक सोसायटीची जागा उपलब्ध करुन देण्यात यावी.

९) शासनाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशांचे अनुपालन करणे एशियाटीक सोसायटी, मुंबई या संस्थेस बंधनकारक राहील.

३. उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च, मागणी क्र. डब्ल्यू-०४, २२०५, कला व संस्कृती,१०५ सार्वजनिक ग्रंथालये, ०३ मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य,(०३)(१०) एशियाटिक सोसायटी, मुंबई ग्रंथालयाचा सर्वांगिण विकास, (२२०५ ३४७५), (कार्यक्रम खर्च) ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, दि.१७.०४.२०१५ भाग-पहिला, उप विभाग एक, मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र.२७, नियम क्र. १४९ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३०८१५४९२२४७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

JAYSHREE JAIDEEP PAWAR

Digitally signed by JAYSHREE JAIDEEP PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=JAYSHREE JAIDEEP PAWAR
Date: 2023.03.08 15:53:10 +05'30'

**(जयश्री ज. पवार )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव नियोजन/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल-१ ( लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई
८. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. अध्यक्ष, एशियाटिक सोसायटी, मुंबई
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१२. निवड नस्ती (साशि-५).